**ग्रामीण रुग्णालय चाळीसगाव, जि. जळगाव येथील मुख्य इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०१६/प्र.क्र.२०/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २४ ऑक्टोबर, २०१६.

वाचा :

१) **आरोग्य सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक : संआसे/कक्ष-३/टे-६/ग्रारुचाळीसगाव मुइबांध/१०९५३-५४/१६, दिनांक १९.१२.२०१५.**

शासन निर्णय :

ग्रामीण रुग्णालय, चाळीसगाव, जि. जळगाव येथील मुख्य इमारत बांधकामाच्या रुपये १२,२७,७५,८९७/- एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. ग्रामीण रुग्णालय, चाळीसगाव, जि. जळगाव येथील मुख्य इमारत बांधकामाचे अंदाजपत्रक सन २०१४-१५ च्या दरसूचीवर आधारित आहे. अंदाजपत्रकातील ५ टक्के पाणी पुरवठा व मलनिस्सारण, ५ टक्के अंतर्गत विद्युतीकरण, ६ टक्के बाहय विद्युतीकरण, ४ टक्के आक्समीक खर्च, १ टक्का विमा याप्रमाणे तरतुदी योग्य करण्यात आल्या आहेत. त्यानुसार रुपये १२५२.५३ लक्ष (अक्षरी रुपये बारा कोटी बावन्न लक्ष त्रेपन्न हजार फक्त) एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशांना खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून या शासन निर्णयाअन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

२) सदरील काम जर अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास त्यात ४ टक्के सेंटेज चार्जेसची तरतूद मिळविण्यात यावी.
३) काम सुरु करण्यापुर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावी.
५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्रमांक- इएनव्ही २०१३/प्र.क्र. १७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
६) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.
७) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

८) सदरचे काम नवीन नमुना नकाशांप्रमाणे करावयाचे झाल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्रज्ञामार्फत नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घेण्यात यावा. तसेच स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सदर नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील. तसेच ही परवानगी मागण्यासाठीचा पत्रव्यवहार जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

३. ग्रामीण रुग्णालय, चाळीसगाव, जि. जळगाव येथील मुख्य इमारत बांधकामावरील खर्च मागणी क्रमांक- एच-८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०२- ग्रामीण आरोग्य सेवा ०४-सार्वजनिक आरोग्य, २००-इतर कार्यक्रम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००)(०१) प्रमुख बांधकामे (४२१० ०१४१), ५३- मोठी बांधकामे" या खाली भागविण्यात यावा.

४. ग्रामीण रुग्णालय, चाळीसगाव, जि. जळगाव येथील मुख्य इमारत बांधकामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

५. हे आदेश शासकीय इमारतींच्या बांधकामांना मंजूरी देण्याबाबत दिनांक २१.०९.२०१६ रोजी झालेल्या सचिव समितीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र १०००/प्र.क्र. ४६/विनियम, दिनांक १५.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- ६८९/इमा-३, दिनांक ०४.०३.२०१६ अन्वये सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२४१५४९०७३७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale

Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: CN = Vivek Rambhaji Dahiphale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2016.10.24 16:43:55 +05'30'

(विवेक दहिफळे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.

४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.

५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, नाशिक.

६. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, जळगाव.

७. वैद्यकीय अधिक्षक, सामान्य रुग्णालय, जळगाव.

८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जळगाव.

९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगाव.

१०. उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, चाळीसगाव.

११. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.जळगाव.

१२. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.

१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. निवडनस्ती (आरोग्य-३).